नाशिक व छत्रपती संभाजीनगर महानगर प्रदेश विकास प्राधिकरणांच्या कार्यक्षेत्रामध्ये प्राधिकरणाद्वारे आकारण्यात येत असलेल्या तडजोड/प्रशमन शुल्कापोटी भरावयाच्या रकमेस "अभय योजना" राबविणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमआरडी-३३२४/प्र.क्र.४८/नवि-७**
४था मजला, मुख्य इमारत,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई -३२.
तारीख: १५ मार्च, २०२४

**प्रस्तावना :-**

नगर विकास विभागाचा आदेश क्र. टिपीव्ही-४३९७/१८९९/प्र.क्र.२०१/९७/नवि-११, दि.१०.११.१९९७ व शासन निर्णय क्रमांक टिपीएस-१९१९/१७३/प्र.क्र.३८/१९/नवि-१३, दि.२७.०५.२०१९ अन्वये अनधिकृत बांधकामाचे तडजोड शुल्क (Compounding Charges) आकारुन विकासकांनी केलेला अपराध सामोपचाराने मिटविण्याविषयी महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना, अधिनियम, १९६६ चे कलम-१४३ अंतर्गत करण्यात आलेल्या तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येते. सदरची कार्यवाही करताना नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी मंजूर केलेल्या वार्षिक बाजार मूल्यदर तक्त्यामधील बांधकामाचे दर/जमीन दर विचारात घेऊन तडजोड शुल्क (compounding charges) आकारणी करण्यात येते. तथापि, आकारणी करण्यात येत असलेल्या तडजोड शुल्क भरण्याबाबत नागरिक व व्यावसायिकांमध्ये उदासिनता दिसून येत आहे. त्यामुळे अनधिकृत बांधकाम नियमानुकुल करणे व त्यामाध्यमातून महसूल प्राप्त करण्यासाठी नागरीक व व्यावसायिकांना प्रोत्साहन देण्याच्या हेतूने नाशिक व छत्रपती संभाजीनगर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांच्या कार्यक्षेत्रातील अनधिकृत बांधकामे नियमितीकरणाकरिता तडजोड शुल्क भरण्याकरिता प्रोत्साहनात्मक "अभय योजना" (Amnesty Scheme) लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नाशिक व छत्रपती संभाजीनगर महानगर प्रदेश विकास प्राधिकरणांच्या कार्यक्षेत्रामध्ये प्राधिकरणाद्वारे सद्यस्थितीत आकारण्यात येत असलेल्या तडजोड/प्रशमन शुल्कापोटी भरावयाची रक्कम यासाठी पुढीलप्रमाणे एकवेळची विशेष बाब म्हणून "अभय योजना"लागू करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

१. "सद्यस्थितीत नाशिक व छत्रपती संभाजीनगर महानगर प्राधिकरणाद्वारे आकारण्यात येत असलेल्या तडजोड/प्रशमन शुल्काच्या रकमेऐवजी पहिल्या ६ महिन्याकरिता ५०% इतकी व तद्नंतरच्या ६ महिन्याकरिता ७ %५इतकी रक्कम तडजोड/प्रशमन शुल्क म्हणून भरण्यास संबंधित बांधकामधारकांना मुभा देण्यात येत आहे."

२. सदरहू अभय योजना या शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू करण्यात करण्यात येत आहे.

३. विनिर्दिष्ट केलेल्या १२ महिन्यांच्या कालावधीनंतर प्रचलित पद्धतीनुसार तडजोड शुल्क आकारण्यात यावे.

४. उक्त प्राधिकरण स्थापन होण्यापूर्वी ग्रामपंचायत क्षेत्रात ग्रामपंचायतीच्या परवानगीने जी बांधकामे झालेली आहेत. त्याअनुषंगाने जी बांधकामे ग्रामपंचायतच्या परवानगीने झालेली आहेत ती विचारात घ्यावीत. परंतु, उर्वरित अतिरिक्त बांधकामांकरीता तडजोड शुल्क आकारून नियमितीकरण करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५२१३३१५२१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2024.03.15 21:42:24 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. अध्यक्ष / उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
६) मा. सभापती / उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
७) मा.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
८) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
९) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) अपर मुख्य सचिव /सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई
१४) विभागीय आयुक्त, नाशिक, छत्रपती संभाजीनगर.
१५) महानगर आयुक्त, नाशिक महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नाशिक
१६) महानगर आयुक्त, छत्रपती संभाजीनगर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, छत्रपती संभाजीनगर
१७) संचालक, नगररचना व मुल्यांकन संचालनालय, पुणे
१८) सह सचिव तथा संचालक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) निवडनस्ती (नवि-७), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.